**महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांचे बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५**

महसूल विभागातील तहसिलदार संवर्गातील अधिका-यांच्या बदल्यांचे अधिकार प्रदान.

**महाराष्ट्र शासन**

**शासन आदेश क्र : टिआरएफ-१०/२००९/प्र.क्र.२५९/ई-१,**

महसूल व वन विभाग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २५ फेब्रुवारी, २०१०.

**वाचा :-** १) शासन आदेश क्रमांक : टीआरएफ १०/२००६/प्र.क्र.७३/ई-१, दिनांक ८.१०.२००७,

२) शासन आदेश क्रमांक : टीआरएफ १०/२००६/प्र.क्र.७३/ई-१, दिनांक २०.५.२००९.

**प्रस्तावना** :-

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांचे बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ६ मध्ये विहित केल्यानुसार महसूल विभागांतर्गत कार्यरत तहसिलदार (वेतनश्रेणी रु. ७,४५०-२२५-११,५००) या संवर्गातील अधिका-यांच्या नियतकालिक बदल्यांसाठी मा. मंत्री (महसूल) महोदय हे "बदली करणारे सक्षम प्राधिकारी" आहेत.

उक्त अधिनियमातील कलम ६ खालील दुस-या परंतुकानुसार प्राप्त झालेल्या शक्तींचा वापर करुन उपरोक्त संवर्गातील अधिका-यांच्या नियतकालिक बदल्यांचे मा. मंत्री (महसूल) यांचेकडे निहित केलेले अधिकार उपरोक्त दिनांक ८.१०.२००७ च्या शासन आदेशान्वये विभागीय आयुक्तांकडे सोपविण्यात आले होते. तथापि, विभागीय आयुक्तांकडे सोपविण्यात आलेले सदर अधिकार उपरोक्त दिनांक २०.५.२००९ च्या शासन आदेशान्वये काढुन घेण्यात आले आहेत.

**शासन आदेश :-**

आता उपरोक्त दिनांक २०.५.२००९ च्या आदेशात सुधारणा करण्याचा निर्णय शासनाने घेतला असून महसूल विभागांतर्गत कार्यरत तहसिलदार या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक (वेतनश्रेणी रु. ७,४५०-२२५-११,५००) बदल्यांसाठी सक्षम प्राधिकाऱ्यांकडे निहित केलेले अधिकार, या आदेशानुसार उक्त अधिनियमातील कलम ६ च्या परंतुकानुसार विभागीय आयुक्त यांचेकडे सोपविण्यात येत आहेत. उक्त अधिनियमातील कलम, ३ मध्ये नमुद केल्याप्रमाणे ज्या तहसिलदारांनी त्यांच्या नेमणुकीचा पदावधी

पूर्ण केला असेल अशाच तहसिलदारांच्या बदल्या करण्यात येतील याबाबत सर्व विभागीय आयुक्तांनी दक्षता घ्यावी.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संगणकीय संकेतस्थळावर **२०१००२२५२०३३२०००** या क्रमांकाने प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

**(चं. भा. म्हात्रे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रती,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
२) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव,
३) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव,
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) प्रधान सचिव(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) सर्व जिल्हाधिकारी,
८) निवड नस्ती.